**महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी,मर्यादित मार्फत मालिका क्रमांक IV द्वारे, उभारलेल्या कर्जरोख्यांवरील सन २०१९-२० करीता प्रथम सहामाही शासन हमी शुल्क पुस्तकी समायोजनाने शासनास अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क्र.११/का.१४३३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७ ऑक्टोबर, २०१९

वाचा :-

१) शासन निर्णय नि.वि.क्र. पाविम-२००२/प्र.क्र.४७/का.१४६१, दिनांक २७/०९/२००२.
२) शासन निर्णय नि.वि. क्र. एमपीव्हीसीएल २०१७/प्र.क्र.२१/का.१४३३, दि.९ मार्च,२०१८
३) शासन निर्णय नि.वि.क्र. एमपीव्हीसीएल २०१८/प्र.क्र.२६/का.१४३३, दि.२६ सप्टेंबर,२०१८
४) शासन निर्णय नि.वि.क्र.एमपीव्हीसीएल-२०१८/प्र.क्र.२६/का.१४३३, दि.१२ मार्च,२०१९

प्रस्तावना:-

राज्यातील पाच पाटबंधारे महामंडळांना निधी उपलब्ध करण्यासाठी खुल्या बाजारातून कर्जरोख्याद्वारे निधीची उभारणी करुन या निधीचे वाटप मा.राज्यपालांच्या निदेशानुसार करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने “महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादित” या विशेष हेतु वाहन (SPV) संस्थेची स्थापना केली आहे. सदर कंपनीचे कामकाज व व्यवस्थापन मे.सिकॉम लि. यांचेमार्फत केले जाते. कर्जरोखे मालिका I, II, III, व IV द्वारे कंपनीने उभारलेल्या एकूण ₹. ७९८.२५ कोटी रोख्यांच्या मुद्दल व व्याजास शासनाने हमी दिलेली आहे. सदर मालिकांपैकी कर्जरोखे मालिका क्रमांक I, II व III चे पूर्णत: विमोचन (Redemed) करण्यात आले असून कर्जरोखे मालिका क्रमांक IV ची मुद्दल व व्याज अदा करणे बाकी आहे. सन २०१९-२० करीता मालिका क्र. IV ची प्रथम सहामाहीची शासन हमीची रक्कम रु. ५८,६८,०००/- (रुपये अठ्ठावन्न लाख अडुसष्ट हजार फक्त) अदा करावयाची आहे. सदरहू शासन हमीची रक्कम शासनास पुस्तकी समायोजनाने अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनीमार्फत उभारलेल्या मालिका क्र. IV ची सन २०१९-२० करीता प्रथम सहामाहीची शासन हमीची रक्कम रु. ५८,६८,०००/- (रुपये अठ्ठावन्न लाख अडुसष्ट हजार फक्त) पुस्तकी समायोजनाने शासनास अदा करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील प्रयोजनासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीमती प्रज्ञा परब, कार्यासन अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा, नियोजन विभाग आणि श्रीमती प्र. सं. महाले, उप सचिव तथा नियंत्रक अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना घोषित करण्यात येत आहे.

३. वरील प्रयोजनासाठीचा रु. ५८,६८,०००/- (रुपये अठ्ठावन्न लाख अडुसष्ट हजार फक्त) इतका खर्च मागणी क्र. ओ-१२, मुख्य लेखाशीर्ष, "५४६५-सर्वसाधारण वित्तीय व व्यापारी संस्थांमधील गुंतवणुका, ०१-सर्वसाधारण वित्तीय संस्थांमधील गुंतवणुका, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०१) महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादितसाठी भाग भांडवल व सेवा खर्च (०१)(०१) महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादितसाठी भाग भांडवल व सेवा खर्च (अनिवार्य) (५४६५ ००४६) ५४-गुंतवणुका " या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच वरील रक्कम पुस्तकी समायोजनाने लेखाशीर्ष “००७५-संकीर्ण सर्वसाधारण सेवा,१०८-हमी फी (००७५००५८)” खाली जमा करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४६/२०१९/ व्यय -८, दिनांक २६ सप्टेंबर, २०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ०८ जुलै, २०१९ सोबतच्या परिशिष्टातील अनु.क्र.९ च्या तपासणी सूचीमधील अट क्र. १,२,३ व ४ ची पूर्तता या प्रकरणी होत आहे. तसेच प्रस्तुत प्रकरणी अनु.क्र. ५ ते १० येथील अटी या प्रकरणी लागू होत नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१००७१५५३२८८५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a94ef1b631f4673b829ac9adbeb5b0ddabd086a7544e3fdf47cd7a011ff7ea40, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2019.10.07 15:56:04 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, नियोजन विभाग**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२

३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

४) मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

६) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

७) मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

८) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य

९) अपर मुख्य सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१०)प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

११) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) , महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/ नागपूर

१२) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/ नागपूर.

१३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१५) व्यवस्थापकीय संचालक मे. सिकॉम लि. सॉलिटेअर कार्पोरेट पार्क, बिल्डींग-४, अंधेरी-घाटकोपर लिंक रोड, चकाला, अंधेरी( पूर्व), मुंबई ४०००९३

१६) प्रबंधक, महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लिमिटेड,द्वारा मे.सिकॉम लि. सॉलिटेअर कार्पोरेट पार्क, बिल्डींग- ४, अंधेरी-घाटकोपर लिंक रोड, चकाला, अंधेरी ( पूर्व), मुंबई ४०००९३

१७) श्रीमती प्र. सं. महाले, उप सचिव (रोख शाखा) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१८) श्रीमती प्रज्ञा परब, कक्ष अधिकारी, (रोख शाखा) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (५प्रती)

१९) कक्ष अधिकारी, का-१४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

२०) वित्त विभाग, व्यय-८/ अर्थसंकल्प-१६/ अर्थबळ/ अर्थोपाय/ऋण व हमी.

२१) निवड नस्ती का-१४३३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.